**पश्चिमवाहिनी नदीखोऱ्यातून (कोकण) अतिरिक्त पाणी मराठवाडयात व गिरणा उपखोऱ्यात वळविण्यासाठी प्राथमिक अभ्यास करणेसाठी समिती गठित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**सुधारित शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१९/(११२/२०१९)/जसंअ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २९ जून, २०२०

संदर्भ : १) मा.मुख्यमंत्री तथा अध्यक्ष राज्य जल परिषद यांच्या अध्यक्षतेखाली दि.२४/७/२०१९ रोजी रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
२) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र.संकीर्ण-२०१९/(११२/२०१९)/जसंअ, दि.१७/९/२०१९

**प्रस्तावना :**

गोदावरी खोऱ्यातील मराठवाडयाचा प्रदेश व गिरणा (तापी) उपखोऱ्यातील प्रदेश हा अत्यंत अवर्षणप्रवण व सातत्याने दुष्काळी प्रदेश आहे. पाण्याची नैसर्गिक उपलब्धता कमी असल्याने कोकणातील अतिरिक्त पाणी वळवून सदरील भागासाठी उपलब्ध करुन देणे हाच पर्याय उपलब्ध आहे. त्यासाठी सविस्तर सर्वेक्षणांती ज्या योजना आर्थिकदृष्टया व्यवहार्य ठरतील, अशा योजनांना मान्यता देऊन त्याची कामे सुरु करणेत येतील. कोकणातील नार-पार, दमणगंगा, उल्हास व वैतरणा या खोऱ्यांच्या लगत असलेल्या असलेल्या मराठवाडयातील गोदावरी नदी खोऱ्यातील पुणेगाव, गंगापूर, वाघाड, करंजवण, भंडारदरा, मुळा, कडवा, मुकणे, भावली इत्यादी धरणांच्या पाणलोट खोऱ्यात हे पाणी वळवून आणता येईल व त्यामार्गे पुढे मराठवाडयातील जायकवाडी धरणापर्यंत पोहोचू शकेल. तसेच गिरणा उपखोऱ्यातही पाणी वळविता येईल.

दि. ३०.०७.२०१९ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत पश्चिम वाहिनी नदी खोऱ्यातून गोदावरी खोऱ्यातील मराठवाडयात व गिरणा (तापी) खोऱ्यात पाणी वळविण्यासाठी प्रस्तावित नदी जोड प्रकल्पाबाबत जलसंपदा विभागाने सादरीकरण केले. सदर सादरीकरणात नदीजोड प्रकल्पाबाबत तसेच जलसंपदा विभागाने मांडलेल्या प्रस्तावाबाबत सखोल चर्चा होऊन मा. मुख्यमंत्री महोदयांनी खालील बाबतीत पुढील कार्यवाही करण्यास तत्वत: मान्यता दिली आहे.

१. आंतराराज्यीय दमणगंगा-पिंजाळ नदीजोड प्रकल्प व राज्यांतर्गत नार-पार-गिरणा,पार गोदावरी, दमणगंगा-वैतरण-गोदावरी व दमणगंगा-एकदरे-गोदावरी हे नदीजोड प्रकल्प राष्ट्रीय प्रकल्प म्हणून न घेता राज्यांतर्गत प्रकल्प म्हणून राज्याच्या निधीतून त्वरीत हाती घेण्यात यावेत. उपरोक्त नदीजोड प्रकल्पामुळे मुंबई शहरासाठी ३१.६० अघफू, गोदावरी खोऱ्यातील मराठवाडा भागात २५.६० अघफू व तापी खोऱ्यासाठी १०.७६ अघफू पाणी कोकणातून उपलब्ध होईल.

२. पश्चिम वाहिनी नदीखोऱ्यातील (कोकण) उल्हास, वैतरणा, नार-पार व दमणगंगा खोऱ्यात एकूण ३६० अघफू अतिरिक्त पाणी उपलब्ध आहे. सदर अतिरीक्त पाणी गोदावरी व गिरणा (तापी) खोऱ्यात वळविणे शक्य आहे. त्यासाठी नवीन नदीजोड योजनांचे सविस्तर सर्वेक्षण व अन्वेषण त्वरीत हाती घेऊन व्यवहार्य योजनांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करावेत.

त्याअनुषंगाने पश्चिम वाहिनी नदी खोऱ्यातून (कोकण) अतिरिक्त पाणी मराठवाडयात व गिरणा उपखोऱ्यात वळविण्यासाठी एकात्मिक राज्य जल आराखडयात प्रस्तावित योजनांबाबत प्राथमिक अभ्यास करणेसाठी संदर्भ क्र. २ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आला होता. नदीजोड योजनांची अंमलबजावणी युध्दपातळीवर करण्याची असल्याने अंमलबजावणी करताना सुसुत्रता, गतिमानता व प्रभावी अंमलबजावणी अतिरिक्त सदस्यांचा समावेश करणे व समितीची कार्यकक्षा वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने संदर्भ क्र. २ चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून सुधारीत शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे :

## सुधारित शासन निर्णय :

पश्चिम वाहिनी नदी खोऱ्यांतून (कोकण) अतिरिक्त पाणी मराठवाडयात व गिरणा (तापी) उपखोऱ्यात वळविण्यासाठी एकात्मिक राज्य जल आराखडयात प्रस्तावित योजनांबाबत प्राथमिक अभ्यास करणे, मार्गदर्शन करणे व सनियंत्रण करणे इ. साठी पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

**अ) समितीची रचना :**

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे | अध्यक्ष |
| २ | कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद | सह अध्यक्ष |
| ३ | मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई | सदस्य |
| ४ | मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक | सदस्य |
| ५ | मुख्य अभियंता, नियोजन व जलविज्ञान, नाशिक | सदस्य |
| ६ | अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे | सदस्य |
| ७ | अधीक्षक अभियंता व प्रशासक लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर | सदस्य |
| ८ | अधीक्षक अभियंता,धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ,धुळे | सदस्य |
| ९ | अधीक्षक अभियंता, उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा, ठाणे | सदस्य सचिव |

**ब) समितीची कार्यकक्षा :**

१. एकात्मिक राज्य जल आराखडयात अंतर्भुत असलेल्या पश्चिम वाहिनी नदी खोऱ्यातून (कोकण) मराठवाडयात व गिरणा (तापी) उपखोऱ्यात पाणी वळविणेसाठीच्या नदीजोड योजनांचा अभ्यास करणे.

२. उपरोक्त नदीजोड योजनांच्या तांत्रिक व आर्थिक व्यवहार्यता विषयक बाबी एकात्मिक राज्य जल आराखडयात अंतर्भूत व इतर निकषांच्या आधारे तपासणे.

३. व्यवहार्य नदीजोड योजनांच्या अंमलबजावणीसाठी प्राधान्यक्रम ठरविणे.

४. नदीजोड योजनांचा प्राथमिक व्यवहार्यता अहवाल तयार करण्यासाठी, तदनंतर सर्वेक्षण अन्वेषण करून सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी तांत्रिक सल्लागार/अभिकरणाच्या नेमणुकीसाठी शिफारस करणे.

**क) इत्तर बाबी**

१. समितीच्या बैठकीसाठी अन्य तज्ञ व्यक्तीस विशेष निमंत्रित म्हणून बोलविण्याचे अधिकार समिती
अध्यक्षांना असतील.

२. शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१९/(१०७/२०१९)/जसंअ
दि. २ ऑगस्ट, २०१९ अन्वये नियुक्त शासनाचे सल्लगार श्री.व्हि.डी.पाटील यांची सेवा आवश्यकतेनुसार उपलब्ध करून घेण्यात यावी

३. शासनाच्या सेवेतील निवृत्त तंज्ञ अधिका-यांची सेवा आवश्यक असल्यास त्यांना सदस्य म्हणुन कंत्राटी पध्दतीने नियुक्त करण्याचे अधिकार समिती अध्यक्षांना असतील.

**ड) अहवाल सादर करण्याचा कालावधी :-**

समितीने हा आदेश निर्गमित झाल्यापासून सहा महिन्याच्या आत अहवाल सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२००७१४१३५११०११४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Rajnish
Ramkishor Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d37cbfb080a0bc996a710b3c0aeea737985dac09cb66bbff878f42ad4e77a606, serialNumber=293016b5f13cd03f75c9f34c66d956309c8b3cd5faf07931d817577e6116e436, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2020.07.22 11:58:30 +05'30'

**( र.रा.शुक्ला )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

३. मा. मंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्ष नेते विधानसभा व विधानपरिषद
६. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९. सचिव (प्रकल्प व समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा, नाशिक
११. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
१२. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
१३. मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई
१४. मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक
१५. मुख्य अभियंता, नियोजन व जलविज्ञान प्रकल्प, नाशिक
१६. अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे
१७. अधीक्षक अभियंता व प्रशासक लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर
१८. श्री.व्हि.डी.पाटील,सेवानिवृत्त अधीक्षक अभियंता,जळगाव तथा तांत्रिक सल्लागार,
१९. अधीक्षक अभियंता, उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा, ठाणे
२० जसंअ कार्यासन संग्रहार्थ